नक्षलवादी हल्ल्यात शहिद झालेल्या पोलिस कर्मचाऱ्यांच्या वारसास अनुकंपा तत्त्वावर नायब तहसिलदार (गट-ब) पदावर नियुक्ती देणेबाबत...
**श्रीमती सविता शाहूदास मडावी.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः अकंपा-२०२१/प्र.क्र.१७/ई-९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
तारीख: ०८ ऑगस्ट, २०२३

**वाचा -**

१) शासन निर्णय, गृह विभाग क्रमांकः पीडबल्युएफ-०२०९/प्र.क्र. १०७/पोल-७, दि.०६.०२.२००९
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः टिआरएन-२०१३/प्र.क्र.८४/१३/१२अ, दि.२०.०१.२०१४

**प्रस्तावना -**

वरील संदर्भाधीन क्र. १ शासन निर्णयान्वये नक्षलवादी हल्ल्यात शहिद झालेल्या पोलीस कर्मचाऱ्यांच्या वारसास अनुकंपा तत्त्वावर शासनसेवेत नियुक्ती देणेबाबतची कार्यपद्धती विहित करण्यात आलेली आहे. पोलीस अधिक्षक, गडचिरोली यांचे आस्थापनेवरील पोशि/२६४६ कै. शाहूदास बाजीराव मडावी हे दि.०१ मे, २०१९ रोजी पोलीस स्टेशन पूराडा, जि. गडचिरोली अंतर्गत जांभूळखेडा गावाजवळ नक्षलवाद्यांनी पेरून ठेवलेल्या भूसुरूंग स्फोटात शहिद झाले आहेत.

शहिद शाहूदास मडावी यांच्या पश्चात त्यांच्या वारसदार पत्नी श्रीम. सविता शाहूदास मडावी या असून, त्यांनी सन २०२० मध्ये राष्ट्रसंत तुकडोजी महाराज विद्यापीठ, नागपूर येथून पदवी पर्यंतचे शिक्षण पूर्ण केले आहे. उक्त संदर्भाधीन क्र. १ मधील शासन निर्णयाच्या तरतूदीनुसार शैक्षणिक अर्हतेची अट पूर्ण करीत असल्याने श्रीम. सविता शाहूदास मडावी यांना शासकीय सेवेत नियुक्ती देण्याबाबत आदेश निर्गमित करण्याकरीता पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य यांच्या कार्यालयाने केलेल्या विनंतीच्या अनुषंगाने गृह विभागाने श्रीम. सविता शाहूदास मडावी यांची नायब तहसिलदार (गट-ब) या पदावर थेट नियुक्ती करण्याबाबतचा निर्णय शासनाच्या मान्यतेने घेतला आहे. त्यानुसार श्रीम. सविता शाहूदास मडावी यांना नायब तहसिलदार (गट-ब) संवर्गात (वेतनश्रेणी- एस-१४, रू.३८६००-१२२८००) पदस्थापना देण्याबाबत गृह विभागाने महसूल व वन विभागास विनंती केली आहे. त्यानुषंगाने श्रीम. सविता शाहूदास मडावी यांना परिवीक्षाधीन नायब तहसिलदार म्हणून नियुक्ती देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश:-**

श्रीम. सविता शाहूदास मडावी यांना खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून "**परिवीक्षाधीन नायब तहसिलदार**" म्हणून नियुक्ती देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :-**

१) सदर उमेदवार यांचा परिवीक्षाधीन कालावधी दोन वर्षाचा असेल.

२) उक्त पदासाठी नियुक्तीवर रुजू होण्याची तारीख त्यांना सामान्य प्रशासन विभागाकडून स्वतंत्रपणे कळविण्यात येईल. सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक- २ येथील शासन निर्णयान्वये विहित केल्यानुसार सदर उमेदवारांस एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम पूर्ण करणे आवश्यक राहील. त्यानुसार सामान्य प्रशासन विभागाने दिलेल्या सुचनेनुसार त्यांना एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत वनामती, नागपूर येथे हजर राहणे आवश्यक राहील.

३) सदर उमेदवार हे नियमाप्रमाणे विहित भाषा संचालनालयामार्फत घेण्यात येणारी मराठी भाषा व हिंदी भाषा परीक्षा उत्तीर्ण झाले नसतील तर त्यांना सदर परीक्षा उत्तीर्ण होणे अनिवार्य राहील. त्याचप्रमाणे नायब तहसिलदार पदाकरिता विहित केलेली विभागीय परीक्षा त्यांना विहित कालावधीत उत्तीर्ण होणे अनिवार्य राहील. परिवीक्षाधीन कालावधीत विहित संधीत विभागीय परीक्षा उत्तीर्ण न झाल्यास परिवीक्षाधीन कालावधी जास्तीत जास्त एक वर्षापर्यंत शासन मान्यतेने वाढविण्यात येईल. या वाढीव कालावधीतही विभागीय परीक्षा उत्तीर्ण न झाल्यास, त्यांच्या सेवा समाप्त करण्यात येतील.

४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. प्रशिक्षण- २०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दिनांक १९ मार्च, २००३ च्या तरतुदीनुसार सदर उमेदवारांनी संगणक हाताळणे /वापराबाबतचे शासन मान्यताप्राप्त प्रमाणपत्र नियुक्तीच्या दिनांकापासून दोन वर्षांच्या आत धारण करणे अनिवार्य राहील. सदर प्रमाणपत्र विहित कालावधीत धारण न केल्यास त्यांच्या सेवा समाप्त करण्यात येतील.

५) सदर उमेदवारांना शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक टिआरएन-१११९/प्र.क्र.६३/सीपीटीपी, दिनांक ३०.१.२०२० नुसार त्यांच्या दोन वर्षाच्या परिवीक्षा कालावधीतील पहिल्या १४ आठवड्यांसाठी रु.३५,०००/- (अक्षरी रु. पस्तीस हजार फक्त) याप्रमाणे ठोक वेतन अनुज्ञेय राहील. तद्नंतर या विभागाकडे तांत्रिक प्रशिक्षणाच्या टप्प्यासाठी हजर झाल्यावर त्यांना १४ आठवड्यांच्या कालावधीत अदा करण्यात आलेली ठोक रक्कम आणि प्रत्यक्ष वेतन यामधील फरकाची रक्कम एकरकमी अदा करण्यात येईल.

६) सदर उमेदवारांना शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. अंनियो १००५/१२६/सेवा-४, दि.३१.१०.२००५नुसार विहित केलेली "राष्ट्रीय निवृत्तिवेतन योजना" लागू राहील.

७) सदर उमेदवारांना नियुक्तीकरिता रुजू होण्यासाठी कराव्या लागणाऱ्या प्रवासासाठी प्रवासभत्ता मिळणार नाही.

८) सदर उमेदवारांनी विहित परिवीक्षाधीन कालावधी किंवा त्यानंतर आवश्यकतेनुसार वाढविलेला परिवीक्षाधीन कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केल्यानंतर त्यांना नायब तहसिलदार या संवर्गात नियमित करण्यात येईल.

९) सदर उमेदवारांना दोन वर्षाचा परिवीक्षाधीन कालावधी समाधानकाररित्या पूर्ण करणे व या कालावधीत त्यांची वर्तणूक समाधानकारक व त्यांच्या पदाला अनुरुप असणे आवश्यक राहील. त्यांनी परिवीक्षा कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण न केल्यास किंवा त्यांची वर्तणूक समाधानकारक व त्यांच्या पदाला अनुरुप नसल्याचे अथवा इतर कारणामुळे ते या पदासाठी योग्य नसल्याचे आढळून आल्यास कोणतीही पूर्वसुचना न देता त्यांची परिवीक्षाधीन पदावरील नियुक्ती समाप्त करण्यात येईल.

१०) वर नमूद केलेल्या अटी व शर्ती व्यतिरिक्त महाराष्ट्र शासनाच्या अधिपत्याखालील राज्यसेवा अधिकाऱ्यांना लागू असलेले अन्य सर्व सेवाविषयक नियम तसेच नायब तहसिलदार संवर्गाचे सेवाप्रवेश नियम लागू राहतील तसेच यापुढे वेळोवेळी शासन जे आदेश देईल त्या आदेशांचे पालन करणेही त्यांना बंधनकारक राहील.

२. श्रीम. सविता शाहूदास मडावी यांची वैद्यकिय तपासणी, चारित्र्य पडताळणी, कागदपत्रांची तपासणी आणि त्यांना नियुक्तीच्या पदावर रूजू करून घेऊन एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत प्रशिक्षण देणे बाबतची पुढील आवश्यक ती कार्यवाही सामान्य प्रशासन विभागाने करावी.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८०९१२०८५८९८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANTOSH VITHOBA GAWDE

Digitally signed by SANTOSH VITHOBA GAWDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=8e111cd4ca87dbe700ee92d0e1b3fd993c8b0952a368e400ed2af72cb5dd990c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CA6A91A5EFCF2DDE6274B385D86F23914275B4E2B1125F6E74E6A1FAC7106C22, cn=SANTOSH VITHOBA GAWDE
Date: 2023.08.09 12:10:01 +05'30'

**( संतोष वि. गावडे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्रीमती सविता शाहूदास मडावी, मु.पो. चिखली, ता. कुरखेडा, जि. गडचिरोली.

**प्रतिलिपी,**

१) मा. राज्यपाल यांचे अपर मुख्य सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा. उप मुख्यमंत्री (वित्त) यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६) अपर मुख्य सचिव (सेवा) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
७) अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे वि.का.अ., महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.

८) अपर मुख्य सचिव (गृह विभाग), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

९) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

१०) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर

११) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, बँक ऑफ इंडियाची मुख्य इमारत, ३ रा मजला, महात्मा गांधी मार्ग, मुंबई- ४०० ००१, (पत्राने)

१२) सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन- सीपीटीपी, मंत्रालय, मुंबई

१३) श्रीम. सविता शाहूदास मडावी (गृह विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे मार्फत)

१४) कार्यासन (ई-१अ/ई-८), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई

१५) निवडनस्ती (ई-९), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई